**“वनसंरक्षण सर्वसाधारण संरक्षण" या योजनेतर योजनेखालील ७९ अस्थायी पदे सन २०१९-२० मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएस-०३/२०१९/प्र.क्र.४२/फ-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १६ ऑक्टोबर, २०१९

वाचा :- १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/योजनेत्तर/प्र.क्र.३९/१८-१९/२०५९, दिनांक १४.२.२०१९.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.२.२०१९
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग समक्रमांक दिनांक १६.३.२०१९
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/यो/प्र.क्र.१/१६-१७/१०५८/१७-१८, दिनांक ३०.९.२०१९.
५) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.९.२०१९
६) शासन निर्णय एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८दिनांक १३.९.२०१९

**शासन निर्णय :-**

जंगलातील अवैध होणारी चोरटी तूट तसेच बेकायदेशीररित्या वाहतूक करण्यात येणारे जंगल उत्पन्न यावर आळा बसावा तसेच आगीपासून वनांचे संरक्षण व्हावे या उद्देशाने "वनसंरक्षण सर्वसाधारण संरक्षण" या योजनेत्तर योजनेमधील ७९ अस्थायी पदांना संदर्भीय क्र.३ येथील दिनांक १६.३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०.९.२०१९ पर्यत चालू ठेवण्यास शासनाची मंजुरी देण्यात आली आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ अन्वये सदर पदे दिनांक १.१०.२०१९ ते दिनांक २९.२.२०२० पर्यत या कालावधीत पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.५ येथे नमूद सूचनास अनुसरुन याद्वारे आता सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील ७९ अस्थायी पदांना दिनांक १.१०.२०१९ ते दिनांक २९.२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे. या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| प्रधान शीर्ष | - | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| उपप्रधान शीर्ष | - | ०१ वनीकरण |
| गौण शीर्ष | - | १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती |
| उप गौण शीर्ष | - | (०३) अग्नीपासून वनांचे संरक्षण |
| | | (०३) (०१) अग्नीपासून वनांचे संरक्षण (२४०६ ०१३१) |

हा शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/वित्तीय सुधारणा-१, दिनांक १५.५.२००९ च्या जोडपत्रातील भाग पहिला उपविभाग-३ येथील अ.क्र.४ परिच्छेद २७ (२) (क) व शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ११.९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९१०१६१६१०३६९३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सोबत** :- विवरणपत्र

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2019.10.16 16:12:09 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने),
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, वन्यजीव (पश्चिम बोरीवली), मुंबई.
५) मुख्य वनसंरक्षक (प्रा.),नागपूर, चंद्रपूर, गडचिरोली, अमरावती,यवतमाळ, ठाणे, नाशिक, कोल्हापूर, धुळे, औरंगाबाद.
६) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
७) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) वित्त विभाग, व्यय-१०/ अर्थ-६, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११) वित्त विभाग, वित्तिय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२) ब-१/फ-२/फ-४ कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) कार्यासन फ-६, महसूल व वन विभाग (निवडनस्ती), मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय क्रमांक :- टिआरएस- ०३/२०१९/प्र.क.४२/फ-६,**

**दिनांक १६ ऑक्टोबर, २०१९ सोबतचे विवरणपत्र "अ"**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | वनरक्षक | ५८ |
| २ | सशस्त्र पोलीस शिपाई | १ |
| ३ | वाहनचालक | ५ |
| ४ | बिनतारी यंत्रचालक | ६ |
| ५ | बिनतारी यंत्रचालक वनपाल | ९ |
| | **एकूण** | **७९** |

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2019.10.16 16:12:32 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने),
महसूल व वन विभाग